**पूर्वीची संक्षिप्त देयके प्रलंबित असताना अन्य संक्षिप्त देयकावर निधी आहरित करून वर्ग करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
शासन निर्णय क्रमांक : वैशिवि- २०२० / प्र.क्र. २८१/ प्रशा-२
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन मंत्रालय,
९ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई -४०० ००१,
दिनांक : ०६ नोव्हेंबर, २०२०

**वाचा :**
१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/ प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक ०७.०३.२०१८.
३) शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांक देयके-२०२०/प्र.क्र.११४/ प्रशा-१, दिनांक ३०.०३.२०२०.
४) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/ आरोग्य- ८, दिनांक ३१.०३.२०२०.

**शासन निर्णय:-**

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या दिनांक २६.०७.२०१७ रोजीच्या शासन निर्णयानुसार वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या अधिपत्याखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रूग्णालये आणि संलग्नित संस्था यांना लागणारी औषधी व सर्जिकल साहित्य, रसायने व उपकरणे इत्यादी बाबींची खरेदी हाफकिन जीव औषध निर्माण महामंडळाकडून खरेदी करणे बंधनकारक करण्यात आलेले आहे. सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागास औषधे, यंत्रसामुग्री व साधनसामुग्री इत्यादीसाठी प्राप्त झालेला निधी यापूर्वी संक्षिप्त देयकावर आहरित करून हाफकीन महामंडळाकडे वर्ग करण्यात आलेला आहे. सदर निधीची तपशीलवार देयके अद्याप संबंधित संस्थांना प्राप्त झालेली नाहीत. सबब विभागाच्या नियंत्रणाखालील शासकीय वैद्यकीय / दंत महाविद्यालये व रुग्णालये व संलग्नित संस्थांना सन २०२०-२१ मध्ये विविध स्त्रोतांद्वारे औषधे व सामुग्री तसेच यंत्रसामुग्री व साधनसामुग्री या बाबींसाठी प्राप्त झालेल्या / होणाऱ्या निधीपैकी प्रशासकीय मान्यता प्राप्त असलेल्या बाबींच्या रकमा संक्षिप्त देयकावर आहरित करून तो निधी हाफकीन जीव औषध निर्माण महामंडळ, मुंबई खरेदी कक्षाकडे तूर्त मार्च, २०२१ पर्यंत वर्ग करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाने आणि हाफकिन महामंडळाने मागील सर्व संक्षिप्त देयकावर आहरित केलेल्या निधीच्या अनुषंगाने औषधे, यंत्रसामुग्री व साधनसामुग्री इत्यादी बाबींच्या खरेदी संदर्भातील देयकांची तपशीलवार देयके कोषागारात पुढील सहा महिन्यात सादर करण्याबाबत कालबध्द कार्यक्रम राबवावा.

३. संक्षिप्त देयकाद्वारे प्राप्त झालेली रक्कम व तपशीलवार देयकाची रक्कम याचा ताळमेळ घालून संचालनालयाने आणि महामंडळाने याबाबत लेखा आक्षेप येऊ नये, याबाबत दक्षता घ्यावी.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३११/२०२०, विनियम, दिनांक २७.१०.२०२० अन्वये दिलेल्या सहमतीच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक २०२०११०६१५५९३२४५१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Swati
Suresh
Lohar

Digitally signed by Swati Suresh Lohar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Medical Education And Drugs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eaef1faf1fb5262ec7b0737903120dfa387867f017650e284f3e90868f26d12d, serialNumber=ab72b061785ae0359686d1c8a0ddb0f52744a155be1924d6ab3706e1de7e60ec, cn=Swati Suresh Lohar
Date: 2020.11.06 16:49:32 +05'30'

( स्वा. सु. लोहार )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखाकार -१/ २ ( लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
२. प्रधान सचिव (ले. व को.), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३. व्यवस्थापकीय संचालक, हाफकीन बायो फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि., मुंबई.
४. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
५. सर्व अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय / दंत महाविद्यालय व रुग्णालय
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. निवासी लेखाधिकारी, मुंबई
८. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
९. कक्ष अधिकारी (विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. कक्ष अधिकारी (प्रशा-१), वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
११. निवडनस्ती (प्रशा-२)